भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “वरिष्ठ खोदन अभियंता” संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियमित बदल्या- २०२३

## महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

### शासन आदेश क्रमांकः आपना-०२२३/प्र.क्र.१२५/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, नवीन मंत्रालय इमारत,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुबई ४०० ००१
तारीख: १६ मे, २०२३

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ मधील तरतुदीनुसार भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील “वरिष्ठ खोदन अभियंता” संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वरिष्ठ खोदन अभियंता यांचे नाव | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. एम .पी. सुरडकर | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती |

बदली आदेशाची तात्काळ व कार्यक्षमरित्या अंमलबजावणी होण्याकरीता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे:-

१. उपरोक्त नमूद वरिष्ठ खोदन अभियंता यांना दिनांक १८/०५/२०२३ (म.नं.) पासून रकाना क्रमांक ३ मध्ये नमूद कार्यालयातून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. सदर आदेश

हेच कार्यमुक्तीचे आदेश असून, संबंधित कार्यालयाने नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही.

२. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी रकाना क्रमांक ४ मध्ये नमूद कार्यालयात तात्काळ रुजू होऊन तसा अहवाल आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्यामार्फत शासनाकडे विनाविलंब सादर करावा. बदली झालेले अधिकारी हे बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्याला रूजू करून न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाधीन काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित कार्यालय प्रमुखास व आस्थापना अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल.

३. सदरहू आदेशान्वये पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे. पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास अथवा बदली आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्याची नोंद घेण्यात यावी. तसेच सदर कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम क्रमांक ३ (तीन) व नियम क्रमांक २३ चा भंग करणारी असल्यामुळे असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व अधिकाऱ्यांचे दिनांक १८/०५/२०२३ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे. दिनांक १९/०५/२०२३ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपुर्वीच्या कार्यालयाकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या कार्यालयात हजर झाल्यानंतर बदली नंतरच्या कार्यालयाने काढावे व तसा अहवाल शासनास सादर करावा. दिनांक १९/०५/२०२३ पासूनचे वेतन बदलीपुर्वी कार्यरत असलेल्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल, अशा सूचना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील सर्व विभागप्रमुख व कार्यालय प्रमुखांना देण्यात येत आहेत.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या संबंधित अधिकारी ते बदली झालेल्या कार्यालयात रूजू झाले आहेत किंवा कसे, याची माहिती तात्काळ शासनास सादर करण्याबाबत आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना सूचित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१६१४५५१७१४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.05.16 16:49:19 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संबंधित वरिष्ठ खोदन अभियंता , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.

**प्रत-**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा, संबंधीत सर्व जिल्हे
५. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर, अमरावती, औरंगाबाद,नाशिक, पुणे, कोकण.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित सर्व जिल्हे.
७. निवडनस्ती कार्यासन, पापु-१५